**उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालयांमधील प्राचार्य व सहाय्यक प्राध्यापक या संवर्गातील रिक्त पदे भरण्यावरील निर्बंध शिथील करणेबाबत..**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: आढावा-१५१३/प्र.क्र.१२५ (भाग-८)/म.शि.५,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १२ नोव्हेंबर, २०२१

**वाचा**:-
१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक:एसआरव्ही २०१५/प्र.क्र.२९०/का-१२, दि.१६ जुलै, २०१५
२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक:पदनि-२०१६/प्र.क्र.३०/२०१६/आ.पु.कक्ष, दि.२५मे, २०१७.
३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक:पदनि-०६१७/प्र.क्र.२०/२०१६/आ.पु.क., दि.०९ जून, २०१७.
४) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक:पदनि-०६१७/प्र.क्र.२०/२०१६/आपुक, दि.२९ जून, २०१७.
५) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०१७/प्रक्र.१७०/मशि-५ दिनांक २३.४.२०१८.
६) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्रमांक:आढावा-१५१३/प्र.क्र.१२५/म.शि.५, दि. ०३.११.२०१८.
७) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक:अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४ मे, २०२०.
८) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०१७/प्रक्र.१७०/मशि-५ दिनांक २३.३.२०२१.
९) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक:अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१.

**प्रस्तावनाः-**

उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालयात मोठ्या प्रमाणात रिक्त असलेल्या प्राचार्य व शिक्षक/शिक्षकेत्तर पदांपैकी उच्च स्तरिय सचिव समितीने मान्यता दिलेली एकूण ४७३८ पदभरतीस संदर्भ क्रमांक ६ च्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाच्या सहमतीने मान्यता दिलेली आहे. त्यापैकी १६७४ पदे भरण्यात आलेली आहेत. तसेच उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील रिक्त असलेली प्राचार्यांची पदे व प्राचार्य पदाचा पाच वर्षाचा कार्यकाल संपुष्टात आल्यानंतर रिक्त होणारी पदे भरण्यासाठी संदर्भ क्रमांक ५ येथील शासन परिपत्रकान्वये मान्यता देण्यात आलेली होती. मात्र, वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ७ येथील शासन निर्णयान्वये पदभरतीवर निर्बंध आणलेले आहेत. प्राचार्य या संवर्गातील रिक्त पदे भरताना शासनावर कोणताही अतिरिक्त आर्थिक भार पडणार नसल्याने, दिनांक ०३.५.२०२० पर्यंत रिक्त असलेल्या एकूण ३७० पदांच्या पदभरतीस संदर्भ क्रमांक ८ येथील शासन परिपत्रकान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. मात्र, दिनांक ०३.५.२०२० नंतर देखील विविध

कारणास्तव प्राचार्य या संवर्गातील पदे रिक्त झालेली आहेत. सदरहू पदे भरल्यामुळे शासनावर कोणताही अतिरिक्त आर्थिक भार पडत नसल्याने, प्राचार्य या संवर्गातील या शासन निर्णयाच्या दिनांकास रिक्त असलेली पदे व प्राचार्य पदाचा पाच वर्षाचा कार्यकाल संपुष्टात आल्यानंतर रिक्त होणारी पदे भरण्यासाठीची आणि सहाय्यक प्राध्यापक या संवर्गातील दिनांक ०१.१०.२०२० च्या विद्यार्थीसंख्येच्या आधारे अनुज्ञेय होणारी एकूण २१६३ पदे विचारात घेता, उच्च स्तरिय सचिव समितीने मंजूर केलेल्या ३५८० पदांपैकी भरलेली १४९२ पदे वजा जाता उर्वरित २०८८ पदांच्या पदभरतीस, वित्त विभागाच्या दिनांक ०४.५.२०२० व दिनांक २४.६.२०२१ च्या शासन निर्णयातील अट शिथिल करून, मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

राज्यातील अकृषि विद्यापीठाशी संलग्नित उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालयांमधील प्राचार्य या संवर्गातील या शासन निर्णयाच्या दिनांकास विविध कारणास्तव रिक्त असलेली पदे व प्राचार्य पदाचा पाच वर्षाचा कार्यकाल संपुष्टात आल्यानंतर रिक्त होणारी पदे भरण्यासाठी तसेच सहाय्यक प्राध्यापक या संवर्गातील उच्च स्तरिय सचिव समितीने मंजूर केलेल्या ३५८० पदांपैकी भरलेली १४९२ पदे वजा जाता, उर्वरित २०८८ पदांच्या पदभरतीस, वित्त विभागाच्या दिनांक ०४.५.२०२० व दिनांक २४.६.२०२१ च्या शासन निर्णयातील अट शिथिल करून, खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहेः-

अ) प्रथमतः अतिरिक्त ठरलेल्या सहाय्यक प्राध्यापकांना रिक्त पदी तातडीने समायोजित करण्यात यावे. संबंधीत विषयाकरीता सहाय्यक प्राध्यापकाचे पद अतिरिक्त नसल्याचे विभागीय सहसंचालकांनी प्रमाणित केल्यानंतरच संबंधीतांना पदभरतीची जाहीरात देता येईल.

आ) निवड झालेल्या उमेदवारांची नियुक्ती सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्ष सुरू होण्याच्या दिनांकापासून करण्यात यावी. तसेच वेतन सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्ष सुरू होण्याच्या प्रथम दिनांकापासून सुरू करण्यात येईल. सदर बाब पदभरतीच्या जाहीरातीमध्ये नमूद करण्यात यावी.

इ) राज्यातील अशासकीय अनुदानित महाविद्यालयांमधील शिक्षक व शिक्षकेतर पदांचा आकृतिबंध निश्चित करण्याच्या अनुषंगाने उच्चस्तरीय सचिव समितीने काही बाबींची पूर्तता करण्याचे निर्देश दिलेले असल्याने, अद्याप आकृतिबंध निश्चित झालेला नाही. त्यामुळे पदभरतीवरील निर्बंध शिथील करुन उपरोक्त प्रमाणे पद भरतीस मान्यता देतांना दिनांक ०१.१०.२०१७ च्या विद्यार्थी संख्येवर अनुज्ञेय होणारी रिक्त पदे ही आधारभूत मानून अनुज्ञेय करण्यात आलेली आहेत. तथापि, आकृतिबंध अंतिम झालेला नसल्याने, आकृतिबंधास वित्त विभागाची अंतिम मंजुरी मिळेपर्यंत सदरची पदे अंतिम समजण्यात येऊ नयेत. त्याव्यतिरिक्त पदांवरील पदभरती केल्यास अशा उमेदावराच्या वेतनाची जबाबदारी ही संबंधीत संस्थेची असेल.

ई) मान्यता दिलेल्या शिक्षकीय पदांची पदभरती करताना प्रत्येक महाविद्यालयास संबंधित विद्यापीठ/नियामक प्राधिकरणाने दिलेली संलग्नता (Affiliation) अबाधित राहण्यासाठी तसेच महाविद्यालयाचे मूल्यांकन (Accreditation) व पुर्नमूल्यांकन (Reaccreditation) होण्याकरिता आवश्यक असलेली मर्यादा विचारात घेऊनच शिक्षकीय पदांचे वाटप करण्यात आलेले आहे. त्यानुसारच पदभरती करण्यात यावी.

उ) अकृषि विद्यापीठ संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील अनुज्ञेय पदभरती करताना विद्यापीठ अधिनियमातील विहीत तरतूदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच विहीत प्रक्रीयेअंती उमेदवाराच्या निवडीनंतर उमेदावारांना सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्षाच्या प्रथम दिनांकास नियुक्ती आदेश निर्गमित करण्यात यावेत.

ऊ) याबाबत मासिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या एक तारखेला संचालकांनी शासनास सादर करावा.

२. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९१८/२०२१/व्यय-५, दिनांक १८.१०.२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२१११११३४१०८९७०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

DATTATRAYA
RAMBHAU KAHAR

Digitally signed by DATTATRAYA RAMBHAU KAHAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER & TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=44c81ed7c5650383de2d3bd4939feb17be94c77ddf9380bfe3d4af1d10cfd393, serialNumber=6c5292c043ebba90984d77378c6e4fb506d9694e3e8f08dd386c5d3f42e79b10, cn=DATTATRAYA RAMBHAU KAHAR
Date: 2021.11.15 12:04:37 +05'30'

**( द.रा. कहार )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुंख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
५. सर्व मा.मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक
६. सर्व मा.विधानसभा सदस्य व विधान परिषद सदस्य
७. मा.मुख्य सचिव
८. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
९. सर्व विभागीय आयुक्त,
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

१२. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा/मूळ शाखा, मुंबई
१३. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१५. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. मा. कुलगुरु, सर्व अकृषि विद्यापीठे.
१७. सर्व विभागीय सहसंचलाक, उच्च शिक्षण.
१८. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे.
१९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), नागपूर/मुंबई, महाराष्ट्र/मुंबई १/२.
२०. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
२१. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२२. सर्व जिल्हा कोषाधिकारी यांची कार्यालये.
२३. मा. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२४. सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२५. म.शि.५ कार्यासन, निवडनस्ती.